अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील
उपसंचालक, गट "अ" (राजपत्रित)
संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदल्यांबाबत

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन आदेश क्रमांक : बदली १११५/प्र.क्र. ६९/का.१४२७**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
विस्तार इमारत, दा. क्र. ६१६, मंत्रालय, मुंबई ४०००३२
तारीख : २० जुलै, २०१५

संदर्भ :- या विभागाचा समक्रमांकाचा दिनांक ०२ जून, २०१५ चा शासन आदेश.

## शासन आदेश

संदर्भाधीन शासन आदेशान्वये अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील उपसंचालक, गट-अ (राजपत्रित) संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदल्यासंदर्भातील आदेश निर्गमित करण्यात आले आहेत. या आदेशाद्वारे उपरोक्त आदेशातील अ. क्र. ०२ येथील श्री.सं.रा.भांगरे, जिल्हा नियोजन अधिकारी यांची बदली जिल्हा नियोजन अधिकारी, अहमदनगर येथे करण्यात आली होती. सदरहू आदेशात अंशत: बदल करण्यात येत आहे. तसेच महाराष्ट्र शासकीय कर्मचारी बदली विनियमन अधिनियम, २००५ मधील कलम ४ (५) अन्वये श्री. कि. भ. जोशी, उपसंचालक, प्रादेशिक कार्यालय, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, औरंगाबाद यांची बदली करण्यात येत आहे. सदरहू दोन्ही अधिकाऱ्यांची पदस्थापना खालील तक्त्यातील स्तंभ क्र. ४ मध्ये दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे :-

| अ. क्र. | नाव | पदनाम | सध्याचे कार्यालय | बदलीनंतरचे पदनाम व कार्यालय |
|---|---|---|---|---|
| १. | श्री. स.रा. भांगरे | जिल्हा नियोजन अधिकारी | पदस्थापनेच्या प्रतिक्षेत | या विभागाच्या समक्रमांकाच्या दिनांक ०२ जून, २०१५ च्या आदेशात अंशत: बदल करून वरिष्ठ संशोधन अधिकारी, अपर आयुक्त, आदिवासी विकास यांचे कार्यालय, नाशिक या पदावर. |
| २. | श्री. कि.भ.जोशी | उपसंचालक | प्रादेशिक कार्यालय, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, औरंगाबाद | जिल्हा नियोजन अधिकारी, अहमदनगर. |

२. संबंधित कार्यालय प्रमुखांनी संबंधित अधिकाऱ्यांच्या पदाचा पदभार अन्य अधिकाऱ्यांकडे सोपवून या अधिकाऱ्यांना बदलीच्या पदावर रुजू होण्याकरिता तात्काळ कार्यमुक्त करावे.

३. बदली करण्यात आलेल्या अधिकाऱ्यांनी त्यांना कार्यमुक्त केल्याबाबतच्या आणि त्यांनी कार्यभार स्विकारल्याच्या आदेशाची प्रत या विभागास अग्रेषित करावी.

४. सदरहू शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०७२०१७२६५६०४१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Priyanka Ranjan Chhapwale

Digitally signed by Priyanka Ranjan Chhapwale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=55fdd77fa8877b50fd182206f763c590c30ce698809f79d37b145fd63e375059, cn=Priyanka Ranjan Chhapwale
Date: 2015.07.21 10:32:25 +05'30'

**(प्रियंका रं. छापवाले)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१ व २, मुंबई /नागपूर
२) मा. मुख्यमंत्री/मा. मंत्री (नियोजन)/मा. राज्यमंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३) विभागीय आयुक्त, नाशिक/पुणे /औरंगाबाद/नागपूर
४) अपर आयुक्त, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नाशिक,
५) जिल्हाधिकारी, नाशिक/अहमदनगर/औरंगाबाद/गडचिरोली
६) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई
७) सर्व सहसचिव/उपसचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
८) सहसंचालक, प्रादेशिक कार्यालय, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, नाशिक/पुणे/औरंगाबाद/नागपूर
९) अपर मुख्य सचिव (नियोजन), मंत्रालय, मुंबई यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
१०) जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती कार्यालय, अहमदनगर
११) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय, नाशिक/अहमदनगर/औरंगाबाद/गडचिरोली
१२) श्री.सं.रा.भांगरे, जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती कार्यालय, गडचिरोली
१३) श्री.कि.भ.जोशी, उपसंचालक, प्रादेशिक कार्यालय, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, औरंगाबाद
१४) कक्ष अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०००३२.
१५) निवड नस्ती.